**मंत्रालयातील विविध विभागांच्या अखत्यारीत असलेल्या कॉपर आधारीत दूरध्वनी सेवा ऑप्टीकल फायबर लाईनमध्ये रुपांतरीत करून घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**परिपत्रक क्रमांक :टिईएल १०११/प्र.क्र.१०४/(निवास-१)/२२**

हुतात्मा राजगुरू चौक,मादाम कामा मार्ग,

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२

दिनांक: १० एप्रिल,२०२४

**संदर्भ :-** सामान्य प्रशासन विभागाचे उपसचिव (श्री.दि. प्र. देशमुख) यांच्या अध्यक्षतेखाली दि.५ जानेवारी २०२४ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णय.

**परिपत्रक**

महानगर टेलिफोन निगम लिमिटेड यांची दूरध्वनी सेवा वारंवार खंडित होत असून तक्रार केल्यावर सुद्धा कारवाई केली जात नाही, अशी तक्रार विविध विभागांकडून कार्यासनाकडे दुरध्वनीद्वारे केली जात आहे. सामान्य प्रशासन विभागाचे उपसचिव (श्री.दि. प्र. देशमुख) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ५ जानेवारी २०२४ रोजी प्रबंधक व उपप्रबंधक महानगर टेलिफोन लिमिटेड यांच्यासोबत मंत्रालयातील वारंवार दूरध्वनी सेवा खंडित होत असलेल्या तक्रारीबाबत बैठक संपन्न झाली.

२. सदर बैठकीत झालेल्या चर्चेनुसार सद्यस्थितीतील मंत्रालयातील कॉपर धातुवर आधारीत असलेल्या दूरध्वनी लाईन नविन अद्ययावत अशी ऑप्टिकल फायबर लाईन मध्ये रुपांतरीत करून घ्यावी, असे उपमहाव्यवस्थापक, महानगर टेलीफोन निगम लिमीटेड यांनी सुचविले आहे.

**दूरध्वनी सेवेसाठी फायबर लाईन चे फायदे-:**

१. फायबर लाईन अद्ययावत अशा तंत्रज्ञानावर आधारीत आहे.

२. फायबर लाईन वर इंटरनेट सेवा अत्यंत वेगवान व कमी त्रूटीयुक्त आहे.

३. दूरध्वनी सेवा खंडीत झाल्यास तक्रारीचे कमी कालावधीत निवारण होते.

४. फायबर लाईन वर STD व लोकल कॉलींग सेवा मोफत आहे.

३. सा.प्र.वि. ने मा. मंत्री कार्यालय, सा.प्र.वि.चे सचिव व विधानभवन,मुंबई येथील कॉपर लाईन चे ऑप्टिकल फायबर लाईन मध्ये रूपांतरीत करण्याचा निर्णय घेतला आहे. या अनुषंगाने, मंत्रालयातील विविध विभागांच्या अखत्यारीत असलेल्या कॉपर धातुवर आधारीत असलेल्या दूरध्वनी लाईन नविन अद्ययावत अशी ऑप्टिकल फायबर लाईन मध्ये रुपांतरीत करून घेणेबाबत विचार करण्यात यावा असे सुचित करण्यात येत आहे.

सदरहू शासन परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०४१०१२५३२३१६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEVIDAS SANDUJI BHAGURE

Digitally signed by DEVIDAS SANDUJI BHAGURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=0990ae5e49835c85a735703503a82e3cd3cdde019c8ce2fdb9c7765ef1b7c39f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2D19FEFD30011466572B4E69158C3099ADDED4CBB59D6833F72ED93F73A564DC, cn=DEVIDAS SANDUJI BHAGURE
Date: 2024.04.18 15:13:27 +05'30'

**( दे. सां. भगुरे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.